**काब-याखडक ता. साक्री, जि. धुळे या लघु प्रकल्पाच्या दुरूस्ती कामाचे अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२१/ (प्र.क्र.२५८/२०२१)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक: ०१ एप्रिल २०२२

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र.जा.क्र.तापाविम/प्रशा-४ / ३३५४/सन २०२१ दि.२/८/२०२१.
२. शासन निर्णय - २०१७/(५६६/१७)/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/(५५१/१७)/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र. प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे) दि १/१/२०१५.

**प्रस्तावना:-**

काब-या खडक लघु प्रकल्प ता. साक्री, जि. धुळे ही योजना कान नदीवर सन २००० या वर्षी पूर्ण करण्यात आलेली आहे. या योजनेचे पाणलोट क्षेत्र ११३.२० चौ.कि. मी. एवढे असून धरणाची लांबी ५८० मी. एवढी आहे. व महत्तम उंची २१.९२ मी इतकी आहे. एकूण पाणीसाठा ३.९६ दलघमी असून जिवंत पाणीसाठा ३.१७ दलघमी आहे. सांडव्याची लांबी १७२ मी. आहे. सिंचन क्षेत्र २५५ हे. एवढे आहे. धरणाचे काम पूर्ण झाल्यामुळे धरण व त्यातील पाणीसाठा हा २००१ पासून सिंचन व्यवस्थापन विभागाकडे हस्तांतरीत केलेला असून कालवा व त्याची वितरण प्रणाली आजपावेतो हस्तांतरीत झालेली नाही ती बांधकाम विभागाकडेच आहे.

सदर प्रकल्पाच्या मुख्य धरणाच्या खालच्या बाजूस सा.क्र. ८० मी. जवळील विमोचकाजवळचा मातीभराव दरवर्षी पावसाळयात खचत असतो. तसेच सदर प्रकल्पाच्या सांडव्याचे कालपरत्वे व इतर कारणास्तव दगडी बांधकामातील पॉईटींग उखडून , mortar बाहेर निघाल्याने बांधकाम पोकळ झाल्याचे व त्यातून गळती होत असल्याचे निर्दशनास आले आहे.या अनुषंगाने भराव दुरूस्ती व सांडवा गळती दुरूस्ती करणेच्या दृष्टीने विशेष दुरूस्ती अंतर्गत तापी पाटबंधारे विकास महामंळडाकडून शासनास अंदाजपत्रक प्राप्त होते.

सदर काम हे जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१/८/२०१९ नुसार कार्यप्रकार-१ मधील प्राधान्यक्रम-२ नुसार प्रस्तावित असुन , त्याअनुषंगाने काब-याखडक ता. साक्री, जि. धुळे या लघु प्रकल्पाच्या दुरूस्ती कामाचे अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव अंतर्गत काब-याखडक ता. साक्री, जि. धुळे या लघु प्रकल्पाच्या दुरूस्ती कामाचे अंदाजपत्रकास या योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या रू. **४,८८,०२,७६८/-** (रू. चार कोटी अठठयाऐंशी लक्ष दोन हजार सातशे अडुसष्ट फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता , निविदा प्रक्रिया , कामाचे नियोजन व पूर्णत्व , प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण , १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत (००((१७) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०२ ७४७२) योजनांतर्गत ५४, गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र.०२ सन २०२२ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४०११४५३००५१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.04.01 14:55:02 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**

**सोबत :- सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३) मा उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१४) मुख्य अभियंता , तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१५) आंतर वित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण , जळगाव,
१७) कार्यकारी अभियंता, धुळे पाटबंधारे विभाग , धुळे
१८) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२१/ (प्र.क्र.२५८/२०२१)/ सिंव्य (कामे),

दि. ०१/ ०४ / २०२२ चे सहपत्र

| अ.क्र. | Description of Item | Amount in ( Rs. ) |
|---|---|---|
| १ | C - Works (excluding Royalty) | ३८१०१७१६ |
| २ | Royalty | २३१८६७५ |
| ३ | १ % Insurance | ३८१०१७ |
| ४ | १८ % GST | ६८५८३०९ |
| ५ | ३ % Contingencies | ११४३०५१ |
| | **Total Rs.** | **४,८८,०२,७६८** |

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.04.01 14:55:16 +05'30'

( वैजनाथ चिल्ले )
शासनाचे उप सचिव